**दोन किंवा अधिक पदांवर नियुक्त्यांच्या कालावधीतील अतिरिक्त वेतन/विशेष वेतन.**

**महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९८८ अनुसार करावयाच्या सुधारणा.**

महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक वेतन-१३९०/प्र. क्र. २/९०/सेवा-८,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० मे १९९०

**निर्णय**

महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ५६ प्रमाणे जेव्हा एखाद्या शासकीय कर्मचाऱ्याकडे त्याच्या स्वतःच्या पदाव्यतिरिक्त दुसऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येतो, तेव्हा अशा दुसऱ्या पदाकरिता त्या पदाच्या संभाव्य वेतनाच्या २० टक्के दराने, परंतु दरमहा रु. २५० एवढ्या मर्यादेपर्यंत, अतिरिक्त वेतन/विशेष वेतन घेण्यास परवानगी देता येते. महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९८८, हे दिनांक १ जानेवारी १९८६ पासून अंमलात आल्यामुळे शासकीय कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीत आता सुधारणा करण्यात आली आहे. वेतनश्रेणीत सुधारणा झाल्यानंतर अतिरिक्त वेतन/विशेष वेतन यांच्या दरामध्ये सुधारणा करण्याचा, तसेच या अनुषंगाने विहित करण्यात आलेल्या वित्तीय मर्यादा सुधारित वेतनश्रेणीच्या संदर्भात सुधारण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबतीत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :—

(अ) महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ५६ प्रमाणे शासकीय कर्मचाऱ्याकडे स्वतःच्या पदाव्यतिरिक्त दुसऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आला तर अशा दुसऱ्या पदाकरिता यापुढे त्या पदाच्या संभाव्य वेतनाच्या १० टक्के दराने, परंतु दरमहा रु. ५०० एवढ्या मर्यादेपर्यंत, अतिरिक्त वेतन/विशेष वेतन घेण्यास परवानगी देण्यात यावी.

(ब) वरील नियमातील खंड (सी) अनुसार रु. ५,९०० व त्याहून अधिक किमान वेतन असलेल्या सुधारित वेतनश्रेणीमध्ये किंवा विस्तारित वेतनश्रेणीमध्ये वेतन घेणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याला कोणतेही अतिरिक्त वेतन/विशेष वेतन अनुज्ञेय असणार नाही.

(क) वरील नियम ५६ खालील टीप ६ प्रमाणे महागाई भत्ता देण्याच्या प्रयोजनासाठी अतिरिक्त वेतन/विशेष वेतन विचारात घेतले जात नाही. यापुढे घरभाडे भत्ता आणि स्थानिक पूरक भत्ता यांचा हिशेब करतानाही ते विचारात घेतले जाणार नाही.

(ड) सहा महिन्यांच्या कालावधीसाठी अतिरिक्त वेतन/विशेष वेतन मंजूर करावयाचे जे अधिकार विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख यांना शासन निर्णय, क्र. पीएवाय-१२८३/सीआर-१९१/सेवा-७, दिनांक २ जानेवारी १९८५ अन्वये प्रदान करण्यात आलेले आहेत ते यापुढेही खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत वापरण्यात यावेत :—

(१) ज्या पदाच्या वेतनश्रेणीतील किमान वेतन रु. ३,२०० हून कमी आहे अशा दुसऱ्या वर्ग १ च्या पदाचा अतिरिक्त कार्यभार धारण करणाऱ्या त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील वर्ग-१ चा अधिकारी (अखिल भारतीय सेवेतील अधिकार सोडून).

(२) ज्या पदाच्या वेतनश्रेणीतील किमान वेतन रु. ३,२०० हून कमी आहे अशा वर्ग १ च्या पदाचा अतिरिक्त कार्यभार धारण करणारा वर्ग २ चा अधिकारी.

२. वित्त विभागाचे परिपत्रक, क्रमांक पीएवाय-१२७५/२५३८/एस-१, दिनांक १ ऑगस्ट १९७५ मधील उल्लेखिलेल्या प्रकरणामध्येच फक्त एक वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी अतिरिक्त वेतन/विशेष वेतन देण्याच्या प्रश्नांचा विचार करण्यात यावा आणि असे प्रस्ताव एक वर्षाचा कालावधी संपण्यापूर्वीच सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभाग यांच्या विचारार्थ त्या विभागांकडे न चुकता पाठवावेत, अशा सूचना शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पीएवाय-१२७७/प्र. क्र. ९९३/सेवा-३, दिनांक १६ नोव्हेंबर १९७८ च्या परिच्छेद ४ अन्वये देण्यात आलेल्या आहेत. तथापि, प्रशासकीय विभाग अतिरिक्त कार्यभाराची व्यवस्था

आपल्या अखत्यारित एक वर्षापुढेही चालू ठेवतात व नंतर सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांच्याकडे कार्योत्तर मंजुरीसाठी असे प्रस्ताव पाठवितात, असे निदर्शनास आले आहे. यासंबंधात असे स्पष्ट करण्यात येते की, अतिरिक्त कार्यभाराची व्यवस्था एक वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी चालू ठेवण्यास प्रशासकीय विभागांनी सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांची आगाऊ मान्यता घेतलेली नसेल अशा कोणत्याही प्रकरणात एक वर्षाच्या पुढील कालावधीसाठी अतिरिक्त वेतन/विशेष वेतन मंजूर करण्यास शासन मान्यता देणार नाही. तसेच, अशी अनियमित व्यवस्था चालू ठेवणाऱ्या अधिकाऱ्यांच्याविरुद्ध जबाबदारी निश्चित करण्यात येऊन त्यांच्याविरुद्ध आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

३. वरील आदेश दिनांक १ ऑक्टोबर १९८८ पासून लागू होतील. ज्या प्रकरणात शासकीय कर्मचाऱ्यांनी या दिनांकाच्या पूर्वीच्या कालावधीसाठी अतिरिक्त कार्यभार धारण केला असेल त्या प्रकरणात अतिरिक्त कार्यभार सांभाळल्याबद्दल जे अतिरिक्त वेतन/विशेष वेतन असुधारित वेतनश्रेणीच्या आधारावर पूर्वीच्या दराने देण्यात आले असेल त्यात बदल होणार नाही. या दिनांकाच्या नंतर धारण केलेल्या/केल्या जाणाऱ्या अतिरिक्त कार्यभाराबद्दल या शासकीय निर्णयात मंजूर करण्यात आलेल्या दराने अतिरिक्त वेतन/विशेष वेतन देय होईल.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ५६ व त्यामधील परिशिष्ट एक मधील अनुक्रमांक १४ यामधील याबाबतच्या विद्यमान तरतुदी या शासन निर्णयाच्या तरतुदीपुरत्या सुधारण्यात आल्या आहेत असे मानण्यात यावे. या नियमात व परिशिष्टात यथावकाश रीतसर सुधारणा करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**अ. ना. कुळकर्णी,**
शासनाचे उप सचिव.

प्रति

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख, प्रादेशिक प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, सेवा-८.

*पत्राद्वारे.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.